# जॉर्ज वॉशिंग्टन

## आणि चेरीचे झाड




रुपांतर: कॅथरीन मॅककाफर्टी

चित्रे: जेरी हार्स्टन

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन

जॉर्ज वॉशिंग्टन यांच्याबद्दल अनेक कथा आणि पुस्तके लिहिली गेली आहेत. जेव्हा अमेरिकी वसाहती आपल्या स्वातंत्र्यासाठी लढत होत्या, तेव्हा त्या लढ्याचे नेतृत्त्व जॉर्ज वॉशिंग्टन यांनी केले. जेव्हा नव्याने स्वतंत्र झालेल्या देशाला एका नेत्याची गरज होती, तेव्हा वॉशिंग्टन हे देशाचे पहिले अध्यक्ष बनले.

जॉर्ज वॉशिंग्टन यांच्या प्रामाणिकपणाचे किस्से तेवढेच प्रसिद्ध आहेत, जेवढ्या त्यांच्या शौर्याच्या कहाण्या. त्यांना दंतकथा म्हणतात, कारण या घटना खरोखरच घडल्या होत्या किंवा नाही, याच्या नोंदी कुठे सापडत नाहीत. कुमारवयीन जॉर्ज वॉशिंग्टनने एक चेरीचे झाड तोडले होते का? कदाचित नसेल. पण ही दंतकथा सांगते की खरे बोलणे किती महत्त्वाचे असते.

चला, आपण पुन्हा त्या काळात जाऊ, ज्या काळात जॉर्ज वॉशिंग्टन कुमारवयीन होते. त्याला आपल्या वडिलांकडून एक अशी भेटवस्तू मिळाली, जी त्याच्या वयाच्या कुणाही मुलाला आवडली असती.





कुमारवयीन जॉर्ज वॉशिंग्टनसाठी तो दिवस खूप छान होता. वयाच्या फक्त सहाव्या वर्षी, त्याच्याकडे स्वतःची कुऱ्हाड होती. त्याला आपल्या या कुऱ्हाडीचा अभिमान होता. ती कुऱ्हाड त्याच्या छोट्याशा हातात मोठी वाटत असे. त्याचे पाते चमकदार आणि धारदार होते. त्यावर चमकणारे सूर्याचे तेज बघण्यासाठी जॉर्ज कुऱ्हाड हवेत फिरवू लागला.

वडिलांनी त्याला थांबवले. "हे काही खेळणं नाहीये, जॉर्ज." त्याच्या वडिलांनी त्याला सल्ला दिला. "तू काळजी घेतली नाहीस, तर ही कुऱ्हाड बरंच नुकसान करू शकते. कुऱ्हाड वापरताना नेहमी काळजी घे."

जॉर्जने वडिलांचे ऐकून मान हलवली. त्याचे वडील, जॉर्ज जणू एक मोठा माणूस आहे, असे समजून त्याच्याशी बोलत होते. एखाद्या कुऱ्हाडीचा मालक असणे, ही तशी मोठीच गोष्ट होती. आपण कुऱ्हाड जबाबदारीने वापरू, असे वचन जॉर्जने वडिलांना दिले.

पण तो घराबाहेर पडल्यावर मात्र त्याचा उत्साह उतू जाऊ लागला. त्याच्या घरच्या शेतात, कापण्यासारख्या बऱ्याच गोष्टी होत्या. जॉर्ज शेतात कुऱ्हाडीच्या धारेची परीक्षा घेऊ लागला.

सर्वप्रथम जॉर्जने मक्याच्या शेताच्या काठावर उगवलेल्या तणांवर आपली कुऱ्हाड चालवली. कुऱ्हाड त्यांच्या पातळ देठांना कापत निघाली. लांबलांब तणांची रांग क्षणार्धात कापली जाऊन त्यांचा ढीग तयार झाला. जॉर्जने स्मित केले. मग त्याने मक्याच्या रोपांच्या जाड देठांना आपले लक्ष बनवले.

तीन देठ सळसळ, करकर आवाज करत एकत्र तुटून पडले. जॉर्ज चमकून मागे हटला. त्याने आपल्या कुऱ्हाडीकडे नव्या आदराने पाहिले. त्याचे वडील बरोबर बोलले होते. त्याने काळजी घेण्याची गरज होती. मग जॉर्जने पाहिले की मक्याचे एक कणीस जमिनीवर पडले होते. हे कणीस मक्याच्या देठापेक्षा जाडजूड होते. पण जॉर्जच्या कुऱ्हाडीने सहजपणे कणसाचे दोन तुकडे केले.

मक्याच्या कणसाच्या शेताजवळच, जॉर्जच्या वडिलांनी फळांची झाडे लावली होती. त्याच्या वडिलांना आपल्या गोड सफरचंदांचा, पीचचा आणि पेअरचा अभिमान वाटत असे. ते झाडांच्या फांद्यांची वेळोवेळी काटछाट करत असत. झाडांवर काही आजार पसरला नाही ना, याची तपासणीही ते करत.





जॉर्जच्या वडिलांनी शेतात सर्वात तरूण असलेल्या चेरीच्या झाडाची जास्त काळजी घेतली. फार दूरवरून त्यांनी त्याचे छोटेसे रोपटे आणले होते आणि आपल्या शेतात रुजवले होते. वर्षावर्षाला ते रोपटे वाढत गेले, अधिकाधिक मजबूत होत गेले. यावर्षी त्याच्या फांद्या फुलांनी बहरल्या. जॉर्जच्या वडिलांना वाटत होते की यावर्षी त्याला फळेसुद्धा लागतील. या लालबुंद चेरीपासून जॉर्जची आई कायकाय खाद्यपदार्थ बनवेल, असे विचार त्यांच्या मनात घोळू लागले,. आपल्या चेरीच्या झाडाला त्यांनी मायेने थोपटले.

जॉर्जचे वडील रात्रीचे जेवण घेण्यास घरी परतले. जॉर्ज धावतच त्यांच्याजवळ गेला. “ही कुऱ्हाड खूप छान कापाकापी करते, बाबा,” तो त्यांना म्हणाला.
त्याचे वडील स्मित करत म्हणाले, “हो, तू आज ती वापरत होतास, तेव्हा मी बघितलं तुला.”
“एवढी छान भेट दिल्याबद्दल तुमचे आभार,” म्हणत जॉर्ज जेवण करण्यासाठी घरात पळाला.

जेवणाच्या टेबलवर बसल्यावर जॉर्जने आपली कुऱ्हाड खोलीच्या कोपऱ्यात ठेवून दिली. पण जेवताना त्याची नजर कुऱ्हाडीवरच स्थिर झाली होती. आता या कुऱ्हाडीने पुढली कोणती मोहीम हाती घ्यायची? तो विचार करू लागला. जॉर्जच्या आईचे जॉर्जवर लक्ष होते. "मला वाटतं, तुझी कुऱ्हाड तू काही चांगल्या कामासाठी वापरावीस, जॉर्ज," ती म्हणाली. "उद्या घरात आग जाळायला लाकडं तोडून आण."

"नक्की आणतो, आई," जॉर्ज म्हणाला. "आज रात्रीच तोडतो लाकडं."
आई म्हणाली, "आधी तू चांगली झोप घे, जॉर्ज."

जॉर्जने कुऱ्हाड पलंगाखाली ठेवली. मग पलंगावर पडून त्याने आपले डोळे मिटले. पण बराच वेळ त्याला झोप लागली नाही. त्याला सकाळपर्यंत थांबायला धीर धरवत नव्हता. आपण लाकडं कापून त्याचा ढीग करतोय, मग तो ढीग वाढून त्याचा मोठा ढीगारा झाला आणि मग एक डोंगर झाला असे दृश्य त्याच्या डोळ्यासमोर तरळू लागले. गाढ झोप लागल्यावर आपण एक महान लाकुडतोडे बनल्याचे स्वप्न त्याला पडले आणि आपल्या कुऱ्हाडीच्या एकाच फटक्यात त्याने सारे जंगल कापून काढले.





पुढल्या दिवशी सकाळी, जॉर्जने घाईघाईत नाश्ता केला. शेवटचा घास तोंडात टाकताच, तो आईला म्हणाला, “आता मी लाकडं तोडायला तयार आहे.” त्याच्या आईने त्याला घरामागचा लाकडांचा ढीग दाखवला.

जॉर्जने लाकडांचा ढीग पाहिला. तो काही डोंगराएवढा मोठा नव्हता. तो एखाद्या ढिगाऱ्याएवढासुद्धा मोठा नव्हता. जॉर्जने काम सुरू केले. त्याने लांब, पातळ फांद्या कापून छोट्या केल्या. मग त्याने या छोट्या तुकड्यांचे आणखी लहान लहान तुकडे केले. आता त्यांचे आणखी छोटे तुकडे करता येणार नाहीत, हे त्याला कळून चुकले. काम पूर्ण झाले, हे आईला सांगण्यासाठी तो घरात पळाला.

“आई, काम पूर्ण केलं मी. आणखी लाकडं आहेत का तोडायला?” जॉर्जने विचारले.
“नाही, जॉर्ज. तू थोडावेळ खेळू शकतोस,” आई म्हणाली.
पण जॉर्जला खेळायचे नव्हते. त्याला आणखी लाकडं कापायची होती.

जॉर्ज बाहेर भटकू लागला. आपल्या कुऱ्हाडीची पुन्हा परीक्षा घ्यावी, असे त्याच्या मनात आले. त्याने एका जुनाट कुंपणाच्या जाडजूड खांबावर कुऱ्हाडीने वार केला. पहिल्याच वारात, त्याच्या कुऱ्हाडीचे पाते खांबात खोलवर आत घुसले. ते बाहेर काढण्यासाठी जॉर्जला जोर लावून खेचावे लागले. “खूप जाड असावं याचं लाकूड,” जॉर्जने विचार केला. तेवढ्यात त्याला तरूण चेरीच्या झाडाचा बुंधा दिसला.

चेरीचा बुंधा जॉर्जला कोवळा वाटला. सफरचंद आणि पेअरच्या झाडांसारखे या झाडाची पूर्ण वाढ झाली नव्हती. जॉर्जने त्या बुंध्यावर वार केला. कुऱ्हाडीचे पाते बुंध्यात खोलवर आत गेले. पण ते सहज बाहर काढता आले. मोडून पडलेल्या चेरीच्या झाडाकडे जॉर्ज अभिमानाने बघू लागला. तेवढ्यात त्याला आठवले, आपल्या वडिलांना हे झाड खूप प्रिय होते. कुऱ्हाडीचा वापर काळजीपूर्वक कर, हा वडिलांचा सल्लाही त्याला आठवला.

जॉर्ज घाईघाईत घरामागच्या लाकडाच्या कोठारात गेला आणि तेथील एका अंधाऱ्या कोपऱ्यात जाऊन बसला.





घराकडे परतताना, जॉर्जच्या वडिलांनी मोडून पडलेले चेरीचे झाड बघितले. त्याच्या बुंध्यावर कुऱ्हाडीचे अनेक घाव होते. आता याला फळे लागू शकणार नाहीत, हे त्यांना कळून चुकले. आता घरी चेरीचे पदार्थही बनणार नाहीत. इतकी मेहनत घेऊन, काळजी घेऊन वाढवल्यावर हे चेरीचे झाड नष्ट झाले होते. ते दुःखाने घराकडे चालू लागले.

जॉर्जने वडिलांना लाकडाच्या कोठाराजवळून जाताना पाहिले. तो सावकाश वडिलांमागोमाग घरात शिरला. त्याने आपली कुऱ्हाड हातात घट्ट धरून ठेवली.

त्याच्या वडिलांना जॉर्ज घरात आल्याची चाहूल लागली. त्यांनी जॉर्जकडे पाहिले. मग त्यांनी त्याच्या कुऱ्हाडीकडे पाहिले. आपले वडील रागाने लाल झाले असल्याचे जॉर्जच्या लक्षात आले. “जॉर्ज,” ते म्हणाले, “आपले चेरीचे झाड कुणी तोडले, माहितीय का तुला?” जॉर्जने एक दीर्घ श्वास घेतला. शिक्षेचा विचार करायचा नाही, असे त्याने ठरवले. तो म्हणाला, “मी खोटं बोलू शकत नाही, बाबा. मीच कापलंय ते चेरीचं झाड.”

जॉर्ज खाली मान घालून आपल्या पायाकडे बघू लागला. त्याला रडू येत होते. “मी कुऱ्हाडीचा वापर काळजीपूर्वक केला नाही. मला माफ करा, बाबा.” आपला श्वास रोखून तो बाबा काय शिक्षा देतील, याची वाट बघू लागला.



जॉर्जच्या वडिलांनी जॉर्जच्या खांद्यावर आपले हात ठेवले. “माझ्याकडे बघ, मुला,” ते म्हणाले. जॉर्जने वडिलांच्या नजरेला नजर मिळवली. आपले वडील रागावलेले नाहीत, हे बघून त्याला आश्चर्य वाटले. ते शांतपणे उभे होते. “पण तू प्रामाणिकपणे खरं सांगितलंस, मुला,” वडील म्हणाले. “एका चेरीच्या झाडापेक्षा मला हे जास्त महत्त्वाचं वाटतं.”

जॉर्जच्या वडिलांना चेरीचे झाड मोडून पडल्याचे वाईट वाटले होते, हे खरे. पण आपला मुलगा खरे बोलला, याचा त्यांना अभिमान वाटला. “लक्षात ठेव, नेहमी खरं बोलत जा,” जॉर्जचे वडील म्हणाले.

जॉर्ज कधीही त्यांचे शब्द विसरला नाही. त्याला आयुष्यभर पुरेल असा धडा मिळाला होता.

# प्रामाणिकपणाची गोष्ट



कुमारवयीन जॉर्जला आपल्या आईवडिलांकडून कुऱ्हाड मिळाल्यावर खूप आनंद झाला. पण जॉर्जने तिचा वापर काळजीपूर्वक केला नाही. त्याने वडिलांनी कष्टाने वाढवलेले चेरीचे झाड कुऱ्हाडीने तोडले. आपण केवढी मोठी चूक केली, हे त्याला नंतर उमगले. पण त्याने आपली चूक वडिलांपासून लपवली नाही. खरं बोलणंच योग्य आहे, याची जॉर्जला जाणीव होती. त्यासाठी वडिलांकडून शिक्षा भोगायलाही तो तयार होता. त्याच्या वडिलांनी त्याला माफ केले आणि त्याच्या प्रामाणिकपणाचे कौतुक केले.

कधीकधी खरं बोलायला भीती वाटते. आपल्याला शिक्षा मिळेल हे माहीत असूनही तुम्ही कधी खरं बोलला आहात का? आपल्या खरं बोलण्याने कुणी दुखावले जाणार असेल तेव्हा खरे बोलणे कठीण जाते. पण घाबरण्यापेक्षा खरं बोलणे योग्य ठरते.

**समाप्त**